कोकण ग्रामीण पर्यटन विकास कार्यक्रमांतर्गत
रायगड जिल्ह्यातील कामांना प्रशासकीय
मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासननिर्णय क्रमांक: कोग्रापविका-२०२४/प्र.क्र. २७/यो-११
बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ
फोर्ट, मुंबई ४०० ००१
दिनांक : १५ मार्च, २०२४

वाचा :-

१. ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्र. कोवियो-२०१५/प्र.क्र.७५ /यो-६, दि.२३ नोव्हेंबर, २०१५.
२. ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्र. ग्रासयो-२०१५/ प्र.क्र.७५ /यो-६, दि.२९ जुलै, २०२०.
३. जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष जिल्हास्तरीय कार्यकारीणी समिती, कोकण ग्रामीण पर्यटन विकास, रायगड- यांचे पत्र क्र. नियोजन/कार्या.५/कोग्रा पर्यटन/प्रस्ताव/२०२२-२३/४१८, दि.२७/०३/२०२३.

प्रस्तावना :-

कोकणातील ग्रामीण भागातील भुमीपुत्रांना त्याच्यां गावात रोजगार व स्वंय रोजगाराच्या संधी उपलब्ध करून देण्याच्या दृष्टीने तसेच कोकणातील विकास कामांची गती वाढविणे या करिता ग्रामीण भागातील पर्यटनाला चालना देण्यासाठी, पर्यटनाचा विकास होणाऱ्या गावामध्ये पर्यटनासाठी पायाभूत सुविधा निर्माण करणे व पर्यायाने गावांचा विकास करणे या उद्देशाने राज्य शासनाने कोकण ग्रामीण पर्यटन विकास कार्यक्रम ही योजना संदर्भिय शासननिर्णय क्र. ०१ अन्वये घोषित केली आहे. या शासननिर्णयास अनुसरून जिल्हाधिकारी, रायगड यांच्याकडून संदर्भ क्र.३ च्या पत्रान्वये राज्यस्तरीय समिती, कोकण ग्रामीण पर्यटन विकास कार्यक्रम योजनेतर्गत मान्यतेसाठी सादर केलेल्या प्रस्तावांना मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

१. कोकण ग्रामीण पर्यटन विकास कार्यक्रमातर्गत संदर्भाधिन दि.२३.११.२०१५ व दि.२९.७.२०२० रोजीच्या शासन निर्णयातील तरतूदींनुसार जिल्हाधिकारी, रायगड यांच्या कार्यालयाकडून सादर झालेल्या विकास कामांतील सोबतच्या परिशिष्ट क्र. ०१ मध्ये यादीत नमूद रु. ५,००,००,०००/- ( रु. पाच कोटी फक्त ) इतक्या रक्कमेच्या कामांना शासनाची प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. वरील बाबींवर होणारा खर्च मागणी क्र.एल-०३ "२५१५ मुख्य लेखाशीर्ष मागणी-२५१५- इतर ग्राम विकास कार्यक्रम-१९६- जिल्हापरिषद/जिल्हास्तरीय पंचायतींना सहाय्य (००) (०७) कोकण ग्रामीण पर्यटन विकास कार्यक्रम (२५१५ २४३२) -३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) (दत्तमत) या लेखाशीर्षाखाली मंजूर तरतुदीतुन भागविण्यात यावा व त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक 202403161148085120 असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

KALU GONYA VALVI

Digitally signed by KALU GONYA VALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=714701fc3db9c38a46f4cd82e1e450b51a9e92eede8c323934f82edb538d3b20, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8C5D0F275C3D9A21DB07FECF7919C2D83796E88930D62D44E7A4A6D4CBEE7E0E, cn=KALU GONYA VALVI
Date: 2024.03.16 14:34:05 +05'30'

**( का.गो.वळवी )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई,
३) मा.उपमुख्यमंत्री(गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.उपमुख्यमंत्री(वित्त)यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५) मा.मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
७) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१,मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
८) विभागीय आयुक्त, आयुक्त कार्यालय, कोकण विभाग, कोकण,
९) जिल्हाधिकारी , रायगड,
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड,
११) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद , रायगड,
१२) जिल्हा कोषागार अधिकारी , रायगड,
१३) नियोजन विभाग,(का-१४४४) मंत्रालय, मुंबई-३२,
१४) वित्त विभाग (व्यय १५,अर्थसं १६ ,अर्थसं १७) मंत्रालय,मुंबई ३२,
१५) कार्यासन क्र. वित्त-१, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६) निवड नस्ती (का.यो-११), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

ग्रामविकास विभाग, शासननिर्णय क्रमांक: कोग्रापविका-२०२४/प्र.क्र.२७/यो-११, दि. १५ मार्च,२०२४
चे सहपत्र

परिशिष्ट-१

| ३ | कामाचे नाव | रक्कम (रु. कोटीत) |
|---|---|---|
| १. | कोल्हारे येथील उल्हास नदी जवळ पांडवकालीन शिवलिंग परिसरातील घाट विकसित करणे तसेच सांस्कृतिक केंद्र उभारणे, ता.कर्जत जि.रायगड | रु.२.०० |
| २. | नेरळ-माथेरान टॅक्सी स्टॅण्ड जवळ स्लॅप ड्रेन बांधणे व परिसर सुशोभिकरण करणे, ता.कर्जत जि.रायगड. | रु.२.०० |
| ३. | मौजे आंबिवली कोथल खलाटी येथील पांडवकालीन लेणी परिसर सुशोभिकरण करणे तसेच सांस्कृतिक केंद्र उभारणे ता.कर्जत, जि.रायगड. | रु.१.०० |
| | एकूण | रु. ५.०० |